**ऑक्टोबर,२००६,२००७ व २००८ या**
**वर्षाच्या आगाऊ वेतनवाढी मंजूर केलेल्या**
**अधिकारी/कर्मचाऱ्यांची सुधारित**
**वेतनश्रेणीत वेतननिश्चिती करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**परिपत्रक क्र.आवेवा-१००९/प्र.क्र.८७/०९/आठ,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दि. ३.७.२००९**

**वाचा :- शा.प.क्र.आवेवा-२००६/प्र.क्र.२०८/०६/आठ, दि.१४.१२.२००६**

**परिपत्रक :-**

शासन सेवेत असताना अतिउत्कृष्ट कामगिरी बजावणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्यांना त्यांच्या गोपनीय अहवालाची प्रतवारी विचारात घेऊन दोन अथवा एक आगाऊ वेतनवाढी देण्याची योजना सद्य:स्थितीत अस्तित्वात आहे. सहाव्या आयोगाच्या शिफारशीनुसार दि.१.१.२००६ पासून शासकीय कर्मचाऱ्यांना सुधारित वेतनश्रेणी देण्यात आली असून वेतनसुधारणा समितीच्या शिफारशीनुसार एक अथवा दोन आगाऊ वेतनवाढ देण्याची प्रचलित योजना बंद करून त्याऐवजी अतिरिक्त एक टक्का उच्च दराने वेतनवाढ संबंधित अधिकारी कर्मचाऱ्यांना मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. याप्रकरणी शासनाचे अंतिम आदेश प्राप्त होण्यासाठी काहीसा कालावधी लागण्याची शक्यता आहे.

सहाव्या वेतन आयोगाने शिफारस केलेली सुधारित वेतनश्रेणी दि.१.१.२००६ पासून लागू करण्यात आली असली तरी देखील दि. १ ऑक्टोबर, २००६, १ ऑक्टोबर, २००७ व १ ऑक्टोबर, २००८ रोजी देय होणाऱ्या आगाऊ वेतनवाढी मंजूर करण्याची कार्यवाही काही विभागांनी/कार्यालयांनी यापूर्वीच केली आहे. त्यामुळे अशा कर्मचाऱ्यांची वेतननिश्चिती सुधारित वेतनश्रेणीत कशी करावी व मंजूर केलेल्या आगाऊ वेतनवाढी त्यामध्ये कशा समाविष्ट कराव्या याबाबत विविध कार्यालयांकडून मौखिक रित्या व नस्तीसंदर्भीत करून विचारणा केली जात आहे. यासर्व बाबी विचारात घेऊन सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना अशा सूचना देण्यात येत आहेत

की, दि. १ ऑक्टोबर, २००६, १ ऑक्टोबर, २००७ व १ ऑक्टोबर, २००८ रोजी देय होणाऱ्या आगाऊ वेतनवाढी ज्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना मंजूर करण्यात आल्या असतील अशा कर्मचाऱ्यांची वेतननिश्चिती तात्पुरत्या स्वरूपात आगाऊ वेतनवाढी शिवाय करण्यात यावी. त्यानंतर आगाऊ वेतनवाढी संदर्भातील शासनाचे अंतिम आदेश प्राप्त झाल्यानंतर ते विचारात घेऊन वरील कर्मचाऱ्यांची वेतननिश्चिती पुन्हा सुधारित करण्यात यावी. मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी हे परिपत्रक त्यांच्या अधिकार क्षेत्रातील सर्व विभाग प्रमुख, कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास आणावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करून करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९०७०३१५२४०७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

**सही/-**

**( श्री. प्र. पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
**निवड नस्ती.**